धृत्वा मानुष-विग्रहं द्विजकुले
लीलाश्चकाराद्भुता:।
स्थित्वा गाणगमण्डलं पुनरगात्
श्रीपर्वतस्याटवीम्।
त्रातुं स्वीयजनाननेक तनुधृक्
योऽभूत् क्षितिं पर्यटन्।
सोऽयं श्रीनरसिंह-सद्गुरूवर:
कुर्यात् सदा मङ्गलम्।। १ ।।

माननीय आप्पासाहेब,

कधीकाळीं आपले 'सुबोध गुरूचरित्र' आणि 'पोथी' यांची द्वितीयावृत्ति 'सार्थ गुरूचरित्र' म्हणून काढाल, त्यावेळीं माझ्या या लेखनाचा अवश्य विचार करावा असा विनंतिपूर्वक आग्रह आहे. आणि

तसा विचार अवश्यमेव कराल तसेच याशिवाय आणखीहि मोलाची भर घालाल अशी फार मोठी अपेक्षा मी बाळगून आहे.

बी. आर्. ठोंबरे.

## विषयानुक्रमणिका {हा एक नमुना समजावा}

### अध्याय १ मंगलाचरण

## ग्रंथ वाचनाच्या आरंभी

१ स जयति सिंदुर वदनो...........
२ या कुन्देन्दु तुषार हार धवला........
३ मूकं करोति वाचालं.............
४ श्रूयतां देव देवेश..............

श्रोता वक्ता श्री समर्थ पांडुरंग हरी। वासुदेव हरी।।
अवधूत चिंतन श्री गुरूदेव दत्त

## ग्रंथ वाचनाच्या अंतीं

१ यदक्षर पदभ्रष्टं मात्रा हीनं च..........
२ अपराध सहस्राणि क्रीयन्तेऽहर्निशं मया........
३ करचरणकृतंवाक्कायजं कर्मजंवा..........

हें आणि अशा पद्धतीचे आणखी कांहीं लाल अक्षरांत छापावे. भिड्यांच्या ‘सार्थ ज्ञानेश्वरीं’त आहे तसे.

## सार्थ ‘गुरूचरित्रा’साठीं कांहीं सूचना

१ पोथीरूपांत छापण्यास हवे. पुस्तकरूपांत नको.
२ पोथी आडवी धरून पान उलटल्यावर वरच्या पानावर ओव्या आणि तेथल्यातेथें सोय म्हणून खालच्या पानावर अर्थ. पान उलटून अर्थ पाहणे गैर सोयीचे होईल. पोथी उघडून धरल्यावर कोणत्याहि ओव्याबरोबर त्याचा अर्थहि एकाच दृष्टिक्षेपांत पाहतां येईल. सहजता साधेल.
३ अध्यायांची अनुक्रमणिका नमुन्याप्रमाणे पोथीच्या सुरवातीस ५१ अध्यायांची संपूर्णपणे द्यावी आणि प्रत्येक पानावर शीर्षक या स्वरूपांत, पानांच्या

अनुरोधाने तिच्यांतील तो तो भाग असावा. त्यापुढे ओव्या क्रमांक असावा.

४ ‘चरितं पवित्रं’यासारख्या चुका सुधारून घ्याव्यात

५ शेवटी चुका राहणारच तेव्हां उत्तम मोठे शुद्धिपत्र जोडावे.

६ ‘प्रत्यय घेतां रोकडा अनुभव’ ‘पापांचे दोष’ असे कांहीं शब्द-प्रयोग काढावेत.

७ सरस्वती गंगाधराने जरी वापरली असली तरी अनुवादांत असली भाषा वापरूं नये. उदाहरणार्थ ‘तारक’ ही बायबली भाषा वाटते. त्याऐवजी ‘उद्धारक’ अधिक योग्य आहे.

८ ‘वेदवाक्यांच्या साक्षीने’ हे तसेच. त्याऐवजी ‘याला प्रमाण वेदवाक्यें आहेत’ असे असावे.

९ ‘इंद्रिय’ असे संदिग्ध नको. मुळांप्रमाणे स्वच्छ नांमनिर्देश करावा.

१० संस्कृत श्लोकावर मुळांत टीका आहेतच. तरीहि ज्यावर टीका नाही, त्यांचे जसे अर्थ दिलेत त्याप्रमाणें सर्वांचाच शब्दशः कंसांत अर्थ द्यावा.

११ ‘अग्निमीळे पुरोहितं’ ‘इषे त्वा’ ‘अग्न अयाहि’ हे मंत्र कंसांत स्वरासहित संपूर्ण द्यावेत. अध्याय ११. अध्याय २६, ३६, ३७ आणि इतरहि कांहीं,

यासंबंधी स्वतंत्रपणे बरेच सुचवावे असा विचार आहे. तत्पूर्वी एक महत्वाचें निवेदन करतो—

‘गुरूचरित्रा’चें ‘लोकशिक्षण’ हें अत्यंत मोलाचें आनुषंगिक कार्य आहे. सरस्वती गंगाधराचें हें कार्य पुढे चालविणे आपणास शक्य होईल असा मला विश्वास वाटतो. म्हणूनच सुचवावे वाटते कीं, अध्याय २६, ३६ आणि ३७ याविषयीं आपण केवळ अनुवादक अशी भूमिका ठेवूं नये. आतां या कार्याचें स्वरूप सांगतो.

सरस्वती गंगाधराच्यावेळीं अगदी सामान्य ब्राह्मण असला तरी त्याला वेदाचें प्राथमिक ज्ञान आणि ब्रह्मकर्म अवगत असे. ‘त म्हणता ताक’ या न्यायाने त्याला केवळ सुचविणे एवढाच काय तो प्रश्न होता. बाकी सर्व कांहीं परंपरेने मिळत असे.

आपण म्हणतो, ज्ञानेश्वरी, दासबोध जीवनांत किती उतरला? याच पद्धतीने असे म्हटले कीं, ‘गुरूचरित्र’ जीवनांत किती उतरले? तर त्यासाठीं कितीहि पारायणें केली तरी जोपर्यन्त अध्याय २६, ३६, ३७ यावर कोणाकडून विस्तृत टीका-टिप्पण्या होत नाहीत तोपर्यन्त हे शक्य नाही. ग्रंथाची पारायणें केली तरीहि जोपर्यन्त त्यांत लिहिल्याप्रमाणे कसे

वागावे हें नीट समजणार नाही तोपर्यन्त तो ग्रंथ आचरणांत आला असे म्हणतां येईल कां?आज सर्वसाधारण विद्यार्थ्याला वरील तीन अध्यायांतील विषय बऱ्याच अंशांत नवीन वाटतात. यामुळें आधुनिक तरूण निष्ठावान होण्याऐवजी नुसता श्रद्धाळू होतो.

सरस्वती गंगाधराने कांहीं काळ शिक्षकाची भूमिका स्वीकारून लोक-शिक्षणाचें हें आनुषंगिक कार्य केले. तेव्हां अनुवादकाचीहि हीच भूमिका रहावी असे मला वाटते.

वरील तीन अध्यायांत अमुक एक मंत्र म्हणून अमुक एक कर्म करावे असे ज्यावेळीं म्हटले जाते त्यावेळीं त्या मंत्राचा केवळ आदी दिला जातो. तुम्हीं म्हणाल ‘संपूर्ण मंत्रासाठीं त्या त्या पोथ्या पहाव्यात.’ परंतु ही शिक्षकाची भूमिका होईल का? ब्राह्मणाने गुरूंना ब्राह्मणाचा आचार कोणता, असा प्रश्न विचारल्यावर ‘ब्रह्मकर्माच्या पोथ्या आहेत, त्यांत पाहून घे’ असे गुरूंना म्हणता आले असते. किंवा असे उद्गार गुरूंच्या तोंडीं सरस्वती गंगाधराला घालता आले असते. परंतु असे कांहीं न करतां इतक्या जुन्या

काळींहि त्यामानाने कितीतरी विस्तार केला आहे. मग आजच्या काळीं या अध्यायांचा अनुवाद किती विस्ताराने करावयास पाहिजे हें काय सांगण्यास हवे असे थोडेच आहे? पूर्वसूरींची संपदा सांभाळून ठेवणें नि:संशय गौरवास्पद आहे. परंतु तिच्यांत वाढ केली तर ते नवीनांचा तिरस्कार करतील काय?

अध्याय ३६—

१ पांच घटिका रात्रीस अर्थात् पहाटे, म्हणजे किती वाजतां त्याचें स्पष्टीकरण करावे.

२ 'श्रीगुरूस्मरण' यासाठीं किंचित् विधीसह एक किंवा दोन सुंदर श्लोक द्यावेत.

३ ब्रह्मा विष्णु महेश ध्यान 'भक्तिमार्गदीप' या आपल्या पुस्तकांतील श्लोक द्यावेत.

४ नवग्रहासाठीं संपूर्ण नवग्रहस्तोत्र. सूर्य केतू सनक सनंदन आदीसाठीं 'कुर्वन्तु सर्वे मम सुप्रभातम्' यांतील निवडक श्लोक द्यावेत.

५ ब्रह्मकर्मातील प्रात:स्मरण त्यांतील शक्य तेवढा भाग द्यावा.

६ आचमनाचा विधी, सिद्धेश्वरशास्त्री चित्राव यांच्या पुस्तकावरून अथवा 'आर्यांची दिनचर्या'

या पुस्तकावरून थोडक्यांत उत्तम प्रकारें विशद करावा.

७ भस्मधारण विधी, स्नानविधी इत्यादि.

जास्त विस्तार करीत नाही. केवळ सूचित करतो. आपण या सर्व गोष्टी उत्तम जाणतां आहांतच.

मला यांतून महत्वाचा मुद्दा हाच सुचवायचा आहे कीं,जेथे 'त्रिसुपर्ण' असा उल्लेख आहे तेथे तें अर्थासह. 'पवमान' म्हटल्यास तेंहि. यामुळें काय होईल? ५०पानें वाढतील.मी म्हणतो वाढूं द्या ना! आपण हा अनुवाद केला याची तरी काय जरूरी होती? किती लोकांना ही गोष्ट पसंत पडली? हें एवढे कष्ट कां म्हणून? माझ्यासारखे चार वेडे सोडून द्या.पण इतर किती जणांना त्याचें मोल समजले आहे? तरीहि आपण गुरू-सेवा म्हणून हें एवढे जिकिरीचें काम केले ना? आपण गुरूसेवा चोख बजावली पण गुरूकार्याचे काय?

मी म्हणतो त्याप्रमाणे केले तर काय वेडेपणा होईल? आणि याला वेडेपणा म्हणणारा आपल्या अनुवादाला तरी शहाणपणा म्हणेल असे मला वाटत नाही. तो सरळ म्हणणार, 'मूळ ग्रंथ पुष्कळच सुबोध

आहे, कशाला या माणसाने एवढे कष्ट उपसले? याला उत्तर आहे?आणि जर नसेल तर माझ्या म्हणण्यालाहि आपण नकार देणार नाहीं, तें मान्य कराल अशी अपेक्षा आहे.

तुमच्या या अनुवादांत ६०/७० पानांची भर घालावी लागणार आहे. जे फार लांबलचक विधी आहेत, त्यासाठीं चांगल्या पुस्तकांचा तेथल्यातेथेच हवाला द्यावा लागेल. कारण तरूण वर्गाला कोणत्या विधीसाठीं कोणते पुस्तक पहावे हेहि ठाऊक नसते. गायत्री उपासनेसाठीं ‘प्रणवोपासना’— वैद्य आणि ‘गायत्री विज्ञान’— श्रीपादशास्त्री किंजवडेकर. जेवढे शक्य होईल तेवढे शक्यतेवढी मेहनत घेऊन तेथल्यातेथें सुस्पष्ट होऊन जावे. उदाहरणार्थ यजुर्वेदाची नेमकी कल्पना एक दोन पानांत दिल्यास ‘पन्नासा’ इत्यादिसंबंधी थोडीफार कल्पना येऊन पाठ करणारास गोडी वाटते. एक वेगळेच समाधान मिळतें.

तुम्हास वाटेल, हें शुक्लकाष्ठ माझ्यामागे लावण्याचा हा उद्योग तुम्ही कां करतां? तर त्याला उत्तर हेंच कीं, दुसरे अनुवादक म्हणून पुष्कळ निघतील पण हें कार्य त्यांच्याकडून होणार नाही. जर

आपण हें कार्य केले तर मी नि:संशय असे म्हणूं शकेन कीं, ‘सार्थ गुरूचरित्र’ ही अत्यंत मोलाची वस्तू माननीय दांडेकर आज तरूण पिढीच्या हातीं देत आहेत.पूज्य कामतांनी भयंकर परिश्रम घेऊन गुरू-सेवेंत प्रथम क्रमांक मिळविला. मी गुरूचरित्रावरील वाङ्मय बारकाईने चाळले आहे. पोथ्यांच्या आवृत्त्या, तळटीपा, गोष्टीरूप, कथानकरूप पुस्तकें हे प्रकार चालूच आहेत. मात्र आपण केलेला संपूर्ण गुरू चरित्राचा—त्यांतील प्रत्येक ओवीचा शब्दश:अर्थ ही अपूर्व गोष्ट आहे. हें एवढे कष्टसाध्य काम करून आपण गुरूचरित्रासंबंधी नेमकी आणि महनीय कामगिरी केली आहे.

माझें आव्हान आहे कीं, पूज्य कामतांच्या नंतर आपणाशिवाय कोणाचा नंबर लागतो हे कोणीहि दाखवून द्यावे. यापुढचें माझें म्हणणें असे कीं, गुरूसेवेंत आपण आपलें स्थान मिळविले पण तें दृढ झालें असे म्हणता येत नाही. त्यासाठीं मी म्हणतो तें संपूर्ण काम राहिले आहे. वस्तुस्थिती अशी आहे कीं, गुरूचरित्रासंबंधी जिव्हाळयाची प्रीति निर्माण झाली आहे. आणि आपल्या श्रेष्ठत्वाची मनोमन साक्ष पटली आहे म्हणून हा अत्याग्रह.

पोथी आणि अर्थ ही दोन पुस्तकें हा विचित्र प्रकार झाला आहे. दुसरी गोष्ट म्हणजे ज्ञानेश्वरी, भागवत, गाथा, अध्यात्म रामायण इत्यादि सर्व ग्रंथ सार्थ छापले गेले आहेत. गुरूचरित्र हाच अपवाद राहिला आहे. सोनोपंत मामांच्या ज्ञानेश्वरी प्रमाणे सुंदर अक्षरांत, मोठया आकारांत, पोथीरूपांत असे 'सार्थ गुरूचरित्र' पाहण्यास मिळावे अशी गोड आशा माझ्या मनांत घट्ट जीव धरून राहिली आहे.

यांत एक महत्वाची सूचना अशी करावी वाटते कीं, याचे ग्राहक म्हणजे गुरूचरित्राचें पारायण करणारा अभ्यासक नव्हें, तर श्रद्धाळू असा फार मोठा वर्ग आहे. तेव्हां मुखपृष्ठ आणि चित्रें इतपासून इतर सर्व गोष्टीविषयीं त्यांचे श्रद्धासंकेत विचारांत घेतले तरच आपल्या श्रमाचे चीज होणार आहे.

इति लेखनसीमा

# गुरूचरित्र : बहिरंग विवेचन

गुरूचरित्राच्या विशेषत: अंतरंगासंबंधीं बरेच लिहिले. या ग्रंथाचें बहिरंग कसे असणे जरूरीचें आहे यासंबंधीं माझी कल्पना काय आहे ती मांडतो.

पहिली गोष्ट अशी सुचवावी वाटते कीं, 'गुरूचरित्र' हा कर्ममार्गी उपासनापर आणि कांहीं प्रमाणांत मंत्रशास्त्रासारखा असला तरी मुख्यत: तो 'वरद-ग्रंथ' आहे. पारायणाचे म्हणजेच खऱ्या अर्थी अनुष्ठानाचे सर्व नियम त्याला लागूं होतात. तेव्हां ज्ञानेश्वरी, दासबोध या ग्रंथापेक्षां तो बहिरंगाने वैशिष्ठ्यपूर्ण असणें आवश्यक आहे. त्यामुळें तो दत्त-भक्तांना नि:संशय प्रिय होईल.

१ नाही म्हटले तरी खळीमुळें आणि बाऊन्ड असल्यामुळें दत्त-संप्रदायांत तो तितकासा मान्य होणार नाहीं. सुटया पानांची पोथी पारायणाला अधिक ग्राह्य मानली जातें. पूज्य कामतांची १६ रूपयांची पोथी लोकप्रिय झाली त्याचें हेंच कारण आहें.

२ सहजगत्त्या हाताळतां येऊ नये असा मोठा आकार हें अगदी दर्शनी वैशिष्ठ्य होईल. पारायणासाठीं असलेली पोथी असा भाव मनांत निर्माण होईल. नाविण्य वाटेल, आकर्षण राहील. आकार वाढल्यामुळें पृष्ठसंख्या कमी होईल. अगदी पात्तळ अशी मोठी पोथी दिसेल. संरक्षण-फळ्यांच्या आधारें मजबुती राखतां येईल.

३ आवरण म्हणून पिवळे रेशमी कापड, त्यांवर सर्वत्र "दिगंबरा दिगंबरा श्रीपादवल्लभ दिगंबरा." हा दत्त-मंत्र छापावा.

४ जाहिरात देतांना—

खास सप्ताह-पारायण करणारासाठीं बुद्ध्या तयार केलेली वैशिष्ठ्यपूर्ण पोथी !!! हा असा आवर्जून उल्लेख करावा. गुरूचरित्र वरद-ग्रंथ म्हणून पारायण करणारांना सुवर्ण-संधि !! यच्चयावत् शब्दासहित प्रत्येक ओवीचा अर्थ असलेली ५२ अध्यायी 'सार्थ गुरूचरित्र' पोथी ! २६, ३६, ३७ इत्यादि अध्यायावर स्पष्टीकरणासाठीं, संपूर्ण मंत्र

आणि मंत्रार्थासाठीं तसेच विधि-विधानांच्या खुलाशा-साठीं विस्तृत माहितीची सदरें आणि परिशिष्टें असलेली अशी सर्वांगसुंदर अपूर्व पोथी !!!!

५ वाडी अथवा औदुंबर अशाच ठिकाणीं कांहीं प्रथितयश महाराजांना एकत्र आमंत्रित करून आणि त्यांचा सत्कार करून, त्यांच्याच हस्तें हा प्रकाशन समारंभ व्हावा आणि त्याचें वृत्त फोटोसहित असलेली एक पुस्तिका या पोथीबरोबर मोफत द्यावी. दत्त-भक्तांना यामुळें आपुलकी आणि जिव्हाळा वाटेल.

आपण मागे राहून अथपासून इतिपर्यन्त हा सर्व समारंभ त्यांच्याकडूनच घडविण्यांत कौशल्य दाखविलें तर तें आपल्या सार्थ पोथीचें भविष्य म्हणून अतिशय फायदेशीर होईल.

मागील आणि हें असें सर्व लेखन जर आपण विचारांत घेतले अथवा तसे घेणे आपणाला शक्य झाले तर मला विश्वास आहे कीं, आपले ‘सार्थ गुरूचरित्र’ हा गुरू-भक्तांना अमोल ठेवा होऊन राहील.

ओम् तत् सत्